सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षामध्ये (२४२५०२२७) या लेखाशीर्षाअंतर्गत १३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांमध्ये (२४२५०२२७) यातील इतर उद्दिष्टामधून पुनर्वितरणाने व (२४२५००६७) या लेखाशीर्षातील उद्दिष्टांमधून पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
शासन निर्णय, क्रमांक : पुनर्वि-२०२२/प्र.क्र.१३९/२२-स,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (वि),मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०२२.

**संदर्भ :-** १) ज्ञापन ,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक .सहक-०१२२/ प्र.क्र.०९/ १२-स, दिनांक ०९.०२.२०२२
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रं. अंवनि/६-सआ/२०२१२२/का.खर्च/मेखे/पुनर्विनियोजन/ २४२५०२२७/ २०२२/३३३, दिनांक १५.०३.२०२२.
३) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक : पुनर्वि-२३२२/ प्र.क्र(१५/२०२२)/१७-स, दिनांक ३१.०३.२०२२

**प्रस्तावना :**

कै.संदिप श्रीधर मेखे, तत्कालिन लेखापरिक्षक सहकारी संस्था, संगमनेर, जि.अहमदनगर यांचा कोविड-१९ संबंधीत जबाबदारी व कर्तव्य बजावताना कोरोना विषाणुचा संसर्ग होऊन मृत्यु झाल्यामुळे शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक २९.०५.२०२० मधील तरतूदीनुसार कैलासवासी संदिप मेखे यांच्या कुटुंबियांना शासनाकडून सानुग्रह अनुदान म्हणून रु.५०.०० लाख इतकी रक्कम सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन ज्ञापनान्वये प्रदान करण्यास मंजूरी दिली आहे. सदर सानुग्रह अनुदान कै.संदिप मेखे यांच्या कुटुंबियांना अदा करण्यासाठी (२४२५०२२७),१३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांतर्गत निधी पुरेसा नसल्यामुळे पुनर्वितरण व पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भाधीन ३ च्या शासन निर्णयानुसार दिलेली मान्यता विचारात घेऊन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षामध्ये या विभागाच्या अधिपत्याखालील सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे कार्यालयासाठी मागणी क्रमांक व्ही-२, मुख्यलेखाशीर्ष २४२५-सहकार १०१, सहकारी संस्थांचे लेखापरीक्षण उपलेखाशिर्ष-(००) (०१)

लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२४२५०२२७) या लेखाशीर्षाअंतर्गत "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टांमध्ये निधीची आवश्यकता असल्यामुळे त्याच लेखाशीर्षाअंतर्गत "११-देशाअंतर्गत प्रवास खर्च" या उद्दिष्टाअंतर्गत बचत होणाऱ्या निधिमधून **रुपये ३०.०० लाख पुनर्वितरणाने** व मागणी क्रमांक व्ही-२, मुख्यलेखाशीर्ष २४२५-सहकार ०१ संचालन व प्रशासन, (०१) (०५) विभागीय व जिल्हा प्रशासन (अनिवार्य) (२४२५००६७), "११-देशाअंतर्गत प्रवास खर्च" या उद्दिष्टाअंतर्गत बचत होणाऱ्या निधिमधून **रुपये २०.०० लाख पुनर्विनियोजनाने असे एकूण रुपये ५०.०० लाख इतका निधी लेखाशीर्ष २४२५०२२७ मधील "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टाअंतर्गत बीडीएस प्रणालीवरउपलब्ध करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे**.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २४१/२०२२/व्यय-२, दिनांक ३१.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीने अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक. २०२२०३३१२३३०५१३८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJU KALLUJI NARPANDE

Digitally signed by RAJU KALLUJI NARPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=445c05397d3e5fac583c028b06de2a1fa2b53743e982f5c31c9f3ffb560b0c16, pseudonym=672F50E9794DD2F3940B5C83752F64C53EAD64B9, serialNumber=F8FAA195025519ECCE143F48FE16B8572D279B7779146441B412B267FB25ACD8, cn=RAJU KALLUJI NARPANDE
Date: 2022.03.31 23:32:53 +05'30'

**( राजु नरपांडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर १/२
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर १/२
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) नाशिक विभाग, नाशिक
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
६. जिल्हा उपकोषागार अधिकारी, संगमनेर, जि.अहमदनगर
७. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (१७-स),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन १२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (२२-स)